शिक्षक भरती प्रक्रिया-पद भरतीसंदर्भातील
निर्बंध शिथिल करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१८/प्र.क्र.३९०/टीएनटी-१**
**मादाम कामा मार्ग,हुत्मामा चौक,**
**मंत्रालय, मुंबई -४०० ०३२**
**दि. ०९ जानेवारी, २०१९**

**वाचा :-**

१) शासन निर्णय वित्त विभाग क्र. संकिर्ण २०१५/प्र.क्र. ६९/१५/वित्तीय सुधारणा दि. १५ जानेवारी, २०१६.

२) शासन निर्णय वित्त विभाग क्र. संकिर्ण २०१५/प्र.क्र.४९/अर्थ-१ दि. ०२ जून, २०१५.

**प्रस्तावना :-**

वेतनावरील खर्च नियंत्रित करण्याकरिता वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयानुसार नवीन पद निर्मितीस पूर्णपणे बंदी घालण्यात आली असून रिक्त पदे भरण्याबाबत काही प्रमाणात निर्बंध घालण्यात आलेले आहेत. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ३-(क) मध्ये शिक्षक व अन्य संवर्गातील एकूण रिक्त पदांच्या ७५% इतक्या मर्यादेत पदे भरण्यास मुभा देण्यात आली आहे. दुष्काळामुळे पडत असलेला अधिकचा आर्थिक भार एकूण वित्तीय स्थितीचा विचार करता संदर्भ क्र.१ येथील दि. ११ जानेवारी, २०१६ च्या शासन निर्णयाअन्वये ७५% च्या मर्यादे ऐवजी ५० % पर्यंत पदे भरण्याची मुभा देण्यात आली आहे.

या विभागामार्फत राज्यातील सर्व स्थानिक स्वराज्य संस्था आणि खाजगी शैक्षणिक संस्थांच्या प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक ,अनुदानित/अंशत: अनुदानित व अनुदानास पात्र घोषित केलेल्या शाळा व अध्यापक विद्यालयामधील शिक्षक भरती करिता “पवित्र” या संगणकीय प्रणालीद्वारे अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणीचे आयोजन शासन निर्णय दि. २३ जून, २०१७ नुसार करण्यात आले आहे. विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक अभ्यासक्रमात अडचण येऊ नये/उपस्थित होऊ नये. याकरिता त्या-त्या अर्हतेच्या व विषयाचा शिक्षक उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. राज्यात प्रथमच स्थानिक स्वराज्य संस्थेसह खाजगी शाळामधील शिक्षक पद भरती एकत्रितरित्या करण्यात येत आहे. शिक्षका अभावी विद्यार्थ्यांचे नुकसान होऊ नये व शिक्षणाचे मानवी आयुष्यातील महत्व विचारात घेता शिक्षकांची पदे भरणे आवश्यक आहे. त्यामुळे संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयानुसार पद भरतीस घालण्यात आलेले निर्बंध शिथिल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थासह सर्व खाजगी शैक्षणिक संस्थांच्या प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक ,अनुदानित/अंशत: अनुदानित व अनुदानास पात्र घोषित केलेल्या शाळा व अध्यापक विद्यालयामधील शिक्षक भरती ” सरल” (Systematic Administrative Reform for Achievement Learning by Student) या संगणकीय प्रणालीवर नोंदणीकृत विद्यार्थ्यांच्या संख्येनुसार संच मान्यता करण्यात येते. शिक्षक भरतीकरिता शासन निर्णय वित्त विभाग

दि. १५ जानेवारी,२०१६ नुसार घातलेले ५० % निर्बंध खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून उठविण्यात येत आहे.

१) संच मान्यतेनंतर अतिरिक्त झालेल्या शिक्षकांच्या समायोजना नंतर देखील शिक्षक अतिरिक्त राहिल्यास अतिरिक्त शिक्षकांच्या संख्ये एवढी त्याच गटातील शिक्षकांची पदे रिक्त ठेवण्यात यावी.

२) १० पेक्षा कमी पटसंख्या असलेल्या शाळेत नवीन पदे भरण्यात येऊ नये.

३) २०० पेक्षा कमी पटसंख्या असलेल्या शाळांमध्ये गट प्रकारानुसार शेवटच्या गटातील शिक्षकांच्या पदासाठी निकषानुसार ५० % पेक्षा जास्त विद्यार्था असल्यासच ते पदे भरण्यात यावे.

४) उच्च माध्यमिक विद्यालयामध्ये तुकडी निहाय मंजूर शिक्षकांची पदे न भरता विषयाशी संबंधित सर्व तुकडयांच्या एकत्रित विद्यार्थ्यांची संख्या विचारात घेऊन पदे भरण्यात यावी.

३. या संदर्भात आयुक्त (शिक्षण) यांनी सर्व शैक्षणिक संस्थांना त्या प्रमाणे रिक्त पदांची माहिती भरण्याबाबत सूचना द्याव्यात. तसेच सदरची माहिती तपासण्याची जबाबदारी संबंधित शिक्षणाधिकाऱ्याची राहिल.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने आणि त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६७१/१८, आ.पु.क.वित्त विभाग दि. ११ डिसेंबर, २०१८ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१९०१०९१६०४५२४५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Yashwantrao Kapadnis

Digitally signed by Swapnil Yashwantrao Kapadnis
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9d4a2777935572a300d248b2271dd1361e9daca04be6c6776fa9545e2476799d, cn=Swapnil Yashwantrao Kapadnis
Date: 2019.01.10 11:23:03 +05'30'

**(स्वप्निल कापडणीस)**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सर्व विधानसभा आणि विधान परिषद सदस्य.
५) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.

६) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव, नगर विकास विभाग/ सामाजिक न्याय व विशेषसहाय्य विभाग/ आदिवासी विकास विभाग/विमुक्त जाती, जमाती व इतर मागासवर्गीय विभाग.
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे-१
१०) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे-१.
११) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक व संशोधन परिषद, पुणे
१३) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे.
१४) अध्यक्ष,महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे.
१५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१६) विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व)
१७) शिक्षण निरीक्षक (उत्तर /पश्चिम /पूर्व), मुंबई.
१८) शिक्षणाधिकारी (प्राथमिक /माध्यमिक/ निरंतर), जिल्हा परिषद (सर्व)
१९) शिक्षणाधिकारी/प्रशासन अधिकारी, महानगरपालीका/नगरपालिका (सर्व)
२०) निवडनस्ती ( कार्यासन-टीएनटी-१)